**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३**
मादाम कामा रोड,  हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक-  ६ मे, २०२०.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाच्या जनजाती कार्य मंत्रालयाचे अधिसूचना क्रमांक- १९/१७/२०१९-आजीविका दि.२६/०२/२०१९.
२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०६.०७.२०१९ रोजीची बैठक.

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री वनधन विकास केंद्र ही योजना केंद्र शासनाने कार्यान्वित केली आहे. भारतीय राज्यघटनेच्या पाचव्या अनुसूचीत नमूद केलेल्या महाराष्ट्रातील अनुसूचित क्षेत्र व इतर क्षेत्रामधील स्वयंसहायता गटातील सदस्यामार्फत गौण वनोपज गोळा करणे, गोळा केलेल्या गौण वनोपज चे मूल्यवर्धन करून विक्री करणे या योजने अंतर्गत आदिवासी क्षेत्रातील आदिवासी कुटुंबाचे स्वयंसहायता गट स्थापन करणे व झालेल्या विक्रीचा नफा मूळ गौण वनोपज गोळा करणाऱ्या आदिवासी लाभार्थ्याला मिळवून देणे हे या योजनेचे मुख्य उद्दिष्ट आहे. भारतीय जनजाती सहकारी विपणन संघ मर्यादित (ट्रायफेड), भारत सरकार यांचेकडून वन धन केंद्राची योजना राबविण्यासाठी संदर्भ क्र १ च्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्यशासनाने स्वतंत्र मार्गदर्शन सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जंगलात निर्माण होणाऱ्या गौण वनोउपजावर आदिवासींचे परंपरागत ज्ञानाचा, कौशल्याचा तसेच त्यासोबत आधुनिक माहिती तंत्रज्ञानाचा उपयोग करुन गौण वनोउपजावर प्रक्रिया करणे व त्याचे मुल्यसंवर्धन करुन त्याची विक्री करणे, त्यामुळे आदिवासीचे जीवनमान उंचावणे हा या योजनेचा मुख्य उद्देश आहे.

केंद्र शासनाच्या जनजाती कार्य मंत्रालयाचे अधिसूचना क्रमांक-१९/१७/२०१९-आजीविका दि.२६.०२.२०१९ अन्वये प्रधानमंत्री वनधन विकास केंद्र ही योजना केंद्र शासनाने कार्यान्वित केली आहे.  त्याअनुषंगाने, राज्यातील स्वयंसहायता गट (Self Help Groups) ज्यामध्ये अनुसूचित जमातीचे किमान ७० टक्के सभासद आहेत त्यांच्या सहाय्याने मोठ्या प्रमाणात प्राप्त होणाऱ्या गौण वनोपजाचे (MFP) व इतर बाबीवर मूल्यवर्धन करून त्याची विक्री करण्यासंदर्भातील प्रधानमंत्री वनधन विकास ही योजना राज्यामध्ये राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

## <u>योजनेचे स्वरुप</u> :-

भारतीय जनजाती सहकारी विपणन संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली यांनी महाराष्ट्रात स्व्यंसहायता गटाच्या सहाय्याने त्याचे क्षेत्रात मोठ्या प्रमाणात प्राप्त होणाऱ्या गौण वनोपज व इतर बाबीवर मुल्यवर्धन करुन त्याची विक्री करण्यासंदर्भात २२० वनधन विकास केंद्र स्थापित करण्याचे उद्दिष्ट निश्चित केले आहे.

प्रधानमंत्री वनधन विकास केंद्र योजना राबविण्यासाठी आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई हे नोडल विभाग राहील. तर शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ हे राज्य अभिकर्ता संस्था (STATE IMPLEIMENTING AGENCY) म्हणून कार्य करेल.

वन धन विकास केंद्राची स्थापना कशा प्रकारे करावी याचे मार्गदर्शक तत्वे भारतीय जनजातीय सहकारी विपणन विकास संघ मर्यादित, नवी दिल्ली यांचे WWW.TRIFED.IN या संकेतस्थळ मार्गदर्शिका उपलब्ध आहे.

त्याअनुषंगाने, सदर योजना राज्यामध्ये राबविण्याकरीता गौण वनोपजाची उपलब्धता लक्षात घेऊन त्यांचे मुल्यवर्धन करुन विक्री करण्याकरीता गांवपातळीवर स्वयंसहाय्यता गट स्थापन करुन वनधन विकास केंद्र निर्माण करण्यांत येईल. भारतीय जनजाती सहकारी विपणन संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली हे पहिल्या टप्प्यात प्रत्येक वनधन विकास केंद्राच्या लाभार्थ्यांच्या प्रशिक्षणाकरीता रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) व प्रत्येक वनधन केंद्राच्या उपकरणे खरेदीकरीता रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) इतका निधी या योजनेद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर योजनेंतर्गत प्राप्त निधीच्या विनियोगासाठी केंद्र शासनाने मार्गदर्शक सुचना दिलेल्या आहेत. त्यानुसार सदर निधी खालील बाबींवर खर्च करणे अपेक्षित आहे.

- गौण वनोउपजाच्या मुल्यवृध्दीसाठी प्रशिक्षण, प्राथमिक प्रक्रिया करणे.
- गौण वनोउपजाची प्रत्यक्ष खरेदी-विक्री व अनुषंगिक खर्च.
- मुल्यवर्धित करण्यासाठी लागणारी उपकरणे खरेदी.
- गौण वनोउपजापासून होणाऱ्या उत्पादनाचे पॅकेजिंग, ब्रॅडिंग करुन विक्री करणे.

वनधन विकास केंद्राने पहिला टप्पा यशस्विरित्या पूर्ण केल्यानंतर दुसऱ्या टप्प्यामध्ये वनधन विकास केंद्राचे बळकटीकरण करण्यासाठी रु.२०.०० लक्ष (रुपये वीस लक्ष फक्त) इतका निधी केंद्र शासन उपलब्ध करुन देईल. या बळकटीकरण निधीमधून खालीलप्रमाणे कामे घेता येतील.

- जमिन विकसित करणे (कुंपन, गेट, इ.) - रु.०३.०० लक्ष
- अतिरिक्त साठवणूकीसाठी (गोदाम, इमारत इ.) तरतूद - रु.१२.०० लक्ष
- अतिरिक्त उपकरणांकरिता - रु.०३.०० लक्ष
- वाहतुकीकरिता (१० केंद्र मिळून) सुविधा - रु.०२.०० लक्ष

## <u>वनधन विकास केंद्र स्थापन करणे</u> :-

१. जवळपासच्या भौगोलिक क्षेत्रातील जास्तीत जास्त २० लाभार्थी मिळून १ स्वयंसहाय्यता गट (SHG) मिळून १ वनधन विकास केंद्र स्थापन करण्यात येईल. स्वयंसहाय्यता गट हा गावपातळीवरील अथवा आजूबाजूच्या गावातील असावे.

२. स्वयंसहाय्यता गटामध्ये जास्तीत जास्त २० लाभार्थी मिळून १ स्वयंसहायता गट (SHG) तयार करावे ज्यात कमीतकमी ७०% पेक्षा जास्त लाभार्थी आदिवासी राहतील.

३. महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), पेसा किंवा वनहक्क कायदा अंतर्गत ग्रामसभेच्या मान्यतने स्थापन केलेली समिती किंवा स्वत: ग्रामसभा, आदिवासी सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) व स्वयंसेवी संस्था (NGO) यांचे अस्तित्वात असलेले स्वयंसहायता गट हे वनधन स्वयंसहाय्यता गटाचे कार्य करु शकतात.

४. स्वयंसहाय्यता गटातील (SHG) सदस्याचे किमान वय १८ वर्ष असणे आवश्यक आहे.

५. वनधन विकास केंद्राच्या व्यवस्थापन समितीमध्ये प्रत्येक स्वयंसहायता गटाचा १ प्रतिनिधी असणे अपेक्षित राहील व त्यामधून वन धन केंद्राचा अध्यक्ष व सचिव निवडला जाईल. अध्यक्ष व सचिव हे अनुसूचित जमातीचे असणे आवश्यक राहील.

६. प्रत्येक स्वयंसहायता गटाने त्यांच्या नजीकच्या बँकेत बँक खाते उघडणे अपेक्षित आहे. हे बँक खाते स्वयंसहाय्यता गटाच्या नावे असावे, परंतु बचत गटाने यापूर्वी बँक खाते उघडलेले असल्यास ते देखील ग्राहय धरता येईल व स्वयंसहाय्यता गटाचे अध्यक्ष व सचिव यांच्या संयुक्त स्वाक्षरीने व्यवहार करणे अपेक्षित आहे.

७. वनधन विकास केंद्राच्या निर्देशानुसार स्वयंसहाय्यता गट कार्य करेल.

८. अस्तित्वात असलेल्या महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), पेसा किंवा वनहक्क कायदा अंतर्गत ग्रामसभेच्या मान्यतेने स्थापन केलेली समिती किंवा स्वत: ग्रामसभा, आदिवासी सहकारी संस्था, स्वयंसेवी संस्था (NGO)/प्राधिकरण् (Agency) यांच्या स्वयंसहायता गटांनी सुद्धा वनधन केंद्र स्थापन करण्यात हरकत नाही. त्यासाठी त्यांचे पूर्वी तयार झालेले स्वयंसहायता गट फोडण्याची आवश्यकता नाही. मात्र प्रत्येक वनधन केंद्रात कमीत कमी ३०० लाभार्थी असणे आवश्यक आहे.

९. वनधन विकास केंद्र व स्वयंसहायता गटाची व्यवस्थापन समिती यांच्या सदस्याने बँकेत खाते उघडणे अपेक्षित आहे व या समितीने ठरवून दिलेल्या २ सदस्य या बँक खात्याचे व्यवहार संयुक्त स्वाक्षरीने करणे अपेक्षित आहे.

१०.वनधन केंद्र वर्षभर कार्यान्वित ठेवण्याकरीता गौण वनोउपजामध्ये समाविष्ट नसलेल्या सिताफळ, जंगली आलं, फणस, समिधा, पळसपान व कृषीउपज इत्यादींचे मुल्यवर्धन करणे या बाबी ग्राहय धरण्यात येतील.

११.वनधन विकास केंद्राला स्थानिक स्तरावर सहकार्य करण्यासाठी राज्य अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) मधील शाखा व्यवस्थापक आणि महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळाचे प्रादेशिक व्यवस्थापक हे संबंधित क्षेत्रात योजना राबविण्यास सहकार्य करतील.

१२.वनधन विकास केंद्र हे गौण वनोपजाचे संगोपनाची प्रक्रिया करण्यासाठी कार्य करत असताना त्या गौण वनोउपजाचे मूळ स्रोताला बाधा होणार नाही याची खबरदारी घेईल व शाश्वत पध्दतीने त्याचा उपयोग केला जाईल याची खबरदारी घेण्यात येईल.

१३.वनधन विकास केंद्र वरीलप्रमाणे कार्यवाही करत नाही असे आढळल्यास राज्य अभिकर्ता (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक)/प्रकल्प अधिकारी याबाबत पुढील आर्थिक अनुदान देणेबाबत निर्णय घेतील.

वनधन विकास केंद्राचे प्रस्ताव प्राप्त करुन त्याची तपासणी व शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

**प्रकल्प समिती :-**

| | | | |
|---|---|---|---|
| १. | प्रकल्प अधिकारी | - | अध्यक्ष |
| २. | प्रादेशिक व्यवस्थापक | - | सदस्य |
| ३. | संबंधित संस्था/MAVIM/MSRLM/स्वयंसेवी संस्था/ग्रामसभा अध्यक्ष | - | निमंत्रित सदस्य |
| ४. | शाखा व्यवस्थापक | - | सदस्य सचिव |

## <u>वनधन विकास केंद्रास मंजूरी देण्याबाबतची कार्यपध्दती</u> :-

१. वनधन विकास केंद्र उभारणीकरीता अर्जा सोबत जोडलेले **परिशिष्ट-१, २, ३, ४ व ५** (व्यवसाय आराखडा) संबंधित प्रकल्प समितीकडे व अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांचेकडे सादर करावेत. त्याशिवाय अभिकर्ता संस्था त्यांचे स्तरावर प्राप्त झालेले प्रस्ताव पण छाननी करु शकतात.

२. प्रकल्प समितीकडे प्राप्त झालेल्या प्रस्तावाची छाननी करुन सदर प्रस्ताव पुढील कार्यवाहीस्तव अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांचेकडे अग्रेषित करावेत.

३. अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांनी सर्व मंजूर केलेल्या वनधन केंद्राचा प्रस्ताव राज्य शासनामार्फत भारतीय जनजातीय सहकारी विपणन विकास संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली येथे मंजूरीसाठी पाठविले जातील.

भारतीय जनजातीय सहकारी विपणन विकास संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली यांचेकडील कार्यकारिणी समिती त्यास मान्यता देऊन राज्य शासनास कळवेल.

४. मंजूर वनधन केंद्रास अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) एक स्वतंत्र ID NUMBER व नाव प्रदान करेल व वनधन विकास केंद्राने त्याच्या पत्रव्यवहारात या नावाचा व ID NUMBER चा उल्लेख करणे अपेक्षित राहील.

## वन धन केंद्रासाठी लागणारा निधी :-

१. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार प्रत्येक वनधन विकास केंद्र प्रशिक्षणासाठी रुपये ५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) व वनधन केंद्रासाठी उपकरणे खरेदीकरीता रुपये १०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) असे एकूण रुपये १५.०० लक्ष (रुपये पंधरा लक्ष फक्त) निधी केंद्र शासनाकडून प्राप्त होईल. तसेच वनधन विकास केंद्र बळकटीकरणासाठी रुपये २०.०० लक्ष (रुपये वीस लक्ष फक्त) इतका निधी प्राप्त होईल. तो खालील बँक खात्यात निधी जमा होईल.

| | |
|---|---|
| **अभिकर्ता संस्थेचे नाव** | :- **श**बरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक |
| **बँकेचे नाव** | :- बँक ऑफ महाराष्ट्र |
| **शाखेचे नाव** | :- कॅनरा कॉर्नर- ६७२ |
| **खाते क्रमांक** | :- ६०३४४९०९१९८ |
| **बँकेचा IFSC क्रमांक** | :- MAHB०००००६७२ |

२. वनधन विकास केंद्रास फिरता निधी (Revolving Fund) न्युक्लियस बजेट योजनेंतर्गत रुपये ७.५० लक्षच्या (रुपये सात लक्ष पन्नास हजार फक्त) मर्यादेत उपलब्ध करण्यांत येईल. वनधन केंद्रास मान्यता दिल्यानंतर जर निधी शबरी महामंडळामार्फत वनधन केंद्रास द्यावयास असल्यास संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी तात्काळ राज्य अभिकर्ता संस्था (शबरी आदिवासी व वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांचेकडे वर्ग करावा अथवा प्रकल्प अधिकारी स्वत: सदर निधी वनधन विकास केंद्रास वर्ग करु शकतील. ही रक्कम ना-परतावा राहील. असे करताना प्रकल्प अधिकारी यांनी अभिकर्ता संस्थेला कळविण्यात यावे. अभिकर्ता संस्था या योजनेच्या अनुषंगाने अद्ययावत माहितीचे संकलन ठेवेल व या करीता पोर्टल तयार करेल.

३. वनधन केंद्राचा प्राप्त निधी वापराबाबत लवचिकता देण्यात आली आहे. उदा. एखाद्या वन धन स्वयंसहायता गटाला प्रशिक्षणाची आवश्यकता नसल्यास सदरचा निधी वनधन विकास केंद्राच्या इतर बाबींकरीता राज्य अभिकर्ता संस्था (SIA) (शबरी आदिवासी व वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांच्या मान्यतेने वापरू शकतील.

४. ज्या स्वयंसहायता गटांकडे मूल्यवर्धन करण्याकरीता उपकरणे उपलब्ध आहेत त्यांनी सदरचा निधी दुसऱ्या बाबींवर राज्य अभिकर्ता संस्था (SIA) (शबरी आदिवासी व वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक) यांच्या मान्यतेने वापरावा.

५. वनधन विकास केंद्राकरीता लागणारी उपकरणे (मशिन्स) इत्यादी राज्य अभिकर्ता संस्था (SIA)/प्रकल्प समिती यांनी GEM PORTAL अथवा ई-निविदा प्रक्रिया राबवून वनधन विकास केंद्राला उपलब्ध करून देतील.

६. वनधन विकास केंद्राला वाहतुकीसाठी वाहन खरेदी करणे तसेच साठवणुकीसाठी गोदाम बांधणे इत्यादी बाबींकरीता निधीची तरतूद करण्यात आलेली नाही. परंतु वनधन विकास केंद्र वाहतूक व साठवणूकीसाठी जागा भाडेतत्वावर घेऊ शकतात.

## वन धन विकास केंद्राची तपासणी :-

- वनधन विकास केंद्र सुरळीत चालू आहे किवा कसे यासाठी प्रकल्प समिती मार्फत तपासणी करण्यात यावी. तसेच शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने नेमून देण्यात आलेले अधिकारीसुद्धा वन धन केंद्राची तपासणी करतील. तपासणीत काही अनियमितता आढळल्यास वनधन विकास केंद्राचे बँक खाते गोठवून अथवा वनधन विकास केंद्राकडे असलेली मालमत्ता ताब्यात घेऊन अनियमित रक्कमेची वसुली करण्यात येईल.
- त्याचप्रमाणे भारतीय जनजातीय सहकारी विपणन विकास संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली यांचेकडून वेळोवेळी त्रयस्थ संस्थेमार्फत वनधन विकास केंद्राची तपासणी व त्याचे मुल्यमापन करण्यात येईल. भारतीय जनजातीय सहकारी विपणन विकास संघ मर्यादित (ट्रायफेड), नवी दिल्ली च्या अधिकाऱ्यांना व त्यांनी नेमलेल्या त्रयस्थ संस्थेस तपासणीसाठी वनधन विकास केंद्र योग्य ते सहकार्य करेल.

## उपयोगिता प्रमाणपत्र :-

**परिशिष्ट-६** प्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र वन धन केंद्राने प्रकल्प समिती तसेच शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक यांचेकडे सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५०६१७५०१४८५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.05.06 18:32:41 +05'30'

**( ल.गो. ढोके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. मंत्री( सर्व) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) राज्यातील सर्व संसद सदस्य
७) मा.विधीमंडळ सदस्य
८) मा.विरोधी पक्षनेता (विधान परिषद)
९) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा)
१०) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव ( महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) सर्व जिल्हाधिकारी.
१५) संचालक, पणन, पुणे
१६) विभागीय व्यवस्थापक, ट्रायफेड, नवी मुंबई.
१७) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ
१८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), बेलापूर, नवी मुंबई.
१९) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
२१) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.
२२) संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
२३) जिल्हा वन अधिकारी.
२४) संबंधित जिल्ह्याचे प्रकल्प अधिकारी, एकात्मिक विकास, आदिवासी विकास.
२५) संबंधित जिल्ह्याचे सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र,
२६) संबंधित प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
२७) वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
२८) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

#####

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

परिशिष्ट-१

**वन धन केंद्राबाबत तपशिल**

**१. वन धन केंद्राचे नांव :-**

**२. केंद्राचे गांव, तालुका, जिल्हा नांव :-**

**३. अध्यक्षांचे संपुर्ण नाव :-**

**४. सचिवांचे संपूर्ण नाव :-**

**५. <u>वन धन केंद्राच्या बॅकेबाबतचा तपशिल</u>**

**अ) बॅकेचे नांव :-**

**ब)) बॅकेंचा IFSC कोड क्रमांक :-**

**क) बॅक खाते क्रमांक :-**

**६. वन धन केंद्रास सहाय्य करणा-या स्वंयसेवी संस्थेचे नाव (MAVIM/MSRLM/NGO) :-**

**७. ज्या गौणवनउपजावर कार्य करणार आहे त्याचे नाव व थोडकयात Business Plan :-**

| | |
|---|---|
| **वन धन केंद्र<br>सचिव स्वाक्षरी** | **वनधन केंद्र<br>अध्यक्ष स्वाक्षरी** |

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

परिशिष्ट-२

**वन धन केंद्र अंतर्गत तयार झालेल्या बचतगटाचा तपशिल**

| अ.नं. | बचतगटाचे नांव | पाडा/गांव | बचतगटाच्या अध्यक्षांचे नाव | बचजगटाच्या सचिवांचे नाव | लाभार्थी संख्या | बचतगटाच्या बॅंकेचा तपशिल | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | बॅंकेचे नाव | बॅंकेचा IFSC कोड | बॅंक खाते क्रमांक |
| १ | | | | | | | | |
| २. | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | |
| ७ | | | | | | | | |
| ८ | | | | | | | | |
| ९ | | | | | | | | |
| १० | | | | | | | | |
| ११ | | | | | | | | |
| १२ | | | | | | | | |
| १३ | | | | | | | | |
| १४ | | | | | | | | |
| १५ | | | | | | | | |

**टिप :- जास्त बचतगट असल्यास वेगळा कागद जोडावा.**

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

## परिशिष्ट-३

## वन धन केंद्रातील बचत गटांचा तपशिल

**१. वन धन केंद्राचे नांव** :-

**२. बचतगटाचे नांव व क्रमांक** :-

**३. बचतगटाचा तपशिल**

**पाडा** :-

**गांव** :-

**तालुका** :-

**३. अध्यक्षांचे संपूर्ण नाव व स्वाक्षरी** :-

**४. सचिवांचे संपुर्ण नाव व स्वाक्षरी** :-

**५. बचतगटाच्या बॅकेचे नांव** :-

**६. बॅकेंचा IFSC कोड क्रमांक** :-

**७. बॅक खाते क्रमांक** :-

**८. E-mail असल्यास त्याचा तपशिल** :-

**९. बचतगटासाठी संपर्क व्यक्तीचे नाव** :-

**१०. संपर्क व्यक्तीचा मोबाईल क्रमांक** :-

**E-mail** I D :-

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

## परिशिष्ट-४

## बचतगटातील लाभार्थ्यांचा तपशिल

| अ.नं | लाभार्थ्याचे नांव | पाडा | लिंग पुरुष/स्त्री | अनुसूचित जातीचे आहेत काय? | पोट जात | बॅंकेचे नाव | बॅंकेचा IFSC कोड | बॅंक खाते क्रमांक | आधार क्रमांक | मोबाईल क्रमांक | स्वाक्षरी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | | | | | | | | | | | |
| २. | | | | | | | | | | | |
| ३. | | | | | | | | | | | |
| ४. | | | | | | | | | | | |
| ५. | | | | | | | | | | | |
| ६. | | | | | | | | | | | |
| ७. | | | | | | | | | | | |
| ८. | | | | | | | | | | | |
| ९. | | | | | | | | | | | |
| १० | | | | | | | | | | | |

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

परिशिष्ट-५

## वन धन केंद्राचे व्यवसाय नियोजन ( Business Plan)

**१. मुल्यवधन करणा-या गौणवनउपजाच्या नावासह तपशिल. :-**

**२. मुल्यवधन करण्यासाठी लागणा-या साहित्याचा तपशिल. :-**

**३. मुल्यवधन करणेकरिता आवश्यक प्रशिक्षणाचा तपशिल. :-**

**४. ब्रॅण्डींग व विक्रीबाबतचे नियोजन. :-**

**५. वन धन केंद्रास सहाय्यक करणा-या स्वंयसेवी संस्थाचे नाव व तपशिल.**
**( MAVIM/MSRLM/NGO)**

**६. ज्या गौणवनउपजावर कार्य करणार बआहे त्याचे नांव व थोडक्यांत Business Plan :-**

शासन निर्णय क्र.एमएफपी-२०२०/प्र.क्र.३०/का.३, दि.६ मे, २०२० चे सहपत्र.

## परिशिष्ट -६

## वन धन केंद्राचे उपयोगिता प्रमाणपत्र ( Utilization Certificate) Form GER-१९-A

| अ.नं. | पत्रातील क्रमांक व दिनांक | मंजुर रक्कम | |
|---|---|---|---|
| १. | | | प्रमाणित करण्यात येते की, रुपये-----------(अक्षरी रुपये ----------------------------) आमच्या वन धन केंद्रास शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाकडुन --------------------पत्रान्वये प्राप्त झाले आहे. सदरच्या निधीपैकी रक्कम रुपये--------------ही सन २०१९-२० या आर्थिक वर्षात ज्या बाबींसाठी मिळाली होती त्याच बाबींसाठी वापरण्यात आलेली आहे. उपरोक्त निधीपैकी रक्कम रुपये---------------निधी शिल्लक आहे. |
| २. | मी खात्रीपुर्वक नमुद करु इच्छितो की, ज्या बाबींसाठी अनुदान मंजुर झाले होते त्याच बाबींसाठी ते खर्च करण्यात आले. | | |

वन धन केंद्र
उपाध्यक्ष स्वाक्षरी

वन धन केंद्र
अध्यक्ष स्वाक्षरी